सन २०२१-२२ या वर्षाकरीता वाईन उद्योगास प्रोत्साहन या योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- वापुमा-२०२२/ प्र.क्र.३८/ उद्योग-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३० मार्च, २०२२

संदर्भ :-

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक डब्ल्यूआयपी २००९/ प्र.क्र.३२८ / २००९/ उद्योग-२, दिनांक ३१/०८/२००९.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. डब्ल्यूआयपी २००९/ प्र.क्र.३२८/२००९/उद्योग-२, दिनांक ०१/०२/ २०१०.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे शासन शुध्दीपत्रक क्रमांक डब्ल्यूआयपी २००९/प्र.क्र.३२८/उद्योग- २, दिनांक २१/०८/२०१०.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे शासन शुध्दीपत्रक क्र. वाप्रोअ-१७१४/प्र. क्र. ३/ उद्योग-२, दिनांक २७/१०/२०१४.
५) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान-२०१९-२०/अे-१०२४, दि.२०/०७/२०१९.
६) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन ज्ञापन क्रमांक वाप्रोअ-२०१९/प्र.क्र. ११०/उद्योग-२, दिनांक २६/०७/२०१९.
७) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान/ वितरण/ २०१९/ अे-१२२२, दि.३०/०८/ २०१९.
८) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान/ दावे/ २०१९/अे-१४६७, दि.१५/११/२०१९.
९) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन ज्ञापन क्रमांक वाप्रोअ-२०१९/ प्र.क्र. ११०/उद्योग-२, दि. २२/०१/२०२०
१०) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान/ दावे/ २०१९/अे-१३२, दि.२७/०१/२०१९.
११) उद्योग उप संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान/ दावे/ २०२०/अे-३८४, दि.१३/०३/२०२०.
१२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. वापुमा-२०२०/प्र.क्र.११५/उद्योग-२, - दि.२३/०३/२०२१.
१३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.०६/०४/२०२१, दि.२४/०६/२०२१ व दि.२९/०७/२०२१.
१४) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र. सोप्रयो वाईन प्रोत्साहन अनुदान दावे/ २०२१/अे-७७२,दि. २६/८/२०२१
१५) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान/ दावे/२०२२/ अे-२५६, दि.०७/०३/२०२२.
१६) उद्योग उप संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान/ दावे/२०२२/अे-४४९, दि.२१/०३/२०२२
१७) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.१७/०३/२०२२

**शासन निर्णय :-**

राज्यातील द्राक्ष उत्पादक शेतक-यांचे नुकसान होऊ नये, शेतक-यांना द्राक्ष लागवडीस प्रोत्साहन देणे, सुकामेवा बनविणे तसेच द्राक्षापासून आर्थिकदृष्ट्या अधिक लाभदायी पर्यायी उत्पादनांची निर्मिती व्हावी तसेच द्राक्षावर आधारीत वाईन उद्योगास प्रोत्साहन म्हणून शासनाने द्राक्ष प्रक्रिया उद्योग धोरण-२००१ दि.१९/१०/२००१ च्या शासन निर्णयान्वये घोषित केले. सदर धोरणाच्या अंमलबजावणीचा भाग म्हणून राज्यामध्ये उत्पादीत केलेल्या व अंतिमत: विक्री झालेल्या वाईनच्या विक्रीवर देय असलेल्या २० टक्के मूल्यवर्धीत कर भरल्यास त्यापैकी १६ टक्के कराच्या रकमेइतके वाईन प्रोत्साहन अनुदान वाईन उद्योगास देण्याबाबतची योजना शासनाने दि.३१/०८/२००९ च्या शासन निर्णयान्वये अमलात आणली आहे.

२. प्रस्तुत योजनेअंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित रक्कम रुपये ३० कोटी ही रक्कम १०० टक्के खर्च झालेली आहे. सन २०१९-२० या आर्थिक वर्षात वा त्यापूर्वीच्या कालावधीचे प्रलंबित असलेले ३४ दावे निकाली काढण्याकरीता रुपये २४,०८,०६,६१७/- एवढया रकमेची आवश्यकता असल्याने, सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या निधीपैकी प्रलंबित दावे निकाली काढण्याकरीता रुपये २४,०८,०६,६१७ /- एवढा निधी वितरणासाठी उपलब्ध करुन देण्याबाबत वित्त विभागास प्रस्ताव सादर केला असता वित्त विभागाने सदर प्रस्तावास मान्यता दिली आहे.

३. सबब, सदर योजनेकरीता उपलब्ध असलेला निधी विचारात घेऊन, संदर्भ क्रमांक १ ते ४ येथे नमूद केलेले शासन निर्णय / परिपत्रक/ शुध्दीपत्रकातील तरतुदी, निकष, पात्रता इत्यादींची पडताळणी/शर्तीची काटेकोर अंमलबजावणी करण्याची खात्री करुन घेण्याच्या अटीच्या अधीन राहून, उद्योग संचालनालयाकडून प्राप्त झालेले सन २०१९-२० या आर्थिक वर्षात अथवा तत्पूर्वीच्या कालावधीत प्रलंबित असलेल्या दाव्यापोटी खालील विवरणपत्रातील रकाना क्र.२ मध्ये नमूद केलेल्या वाईन उद्योग घटकाला रकाना क्र.४ मध्ये नमूद केल्यानुसार रुपये २४,०८,०६,६१७/- (रुपये चोवीस कोटी आठ लक्ष सहा हजार सहाशे सतरा फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ क्र | घटकांचे नाव | कालावधी (दिनांक) | वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ग्रोवर झंपा वाईनयार्डस् लि. मुंबई | १/०४/२०१८ ते ३०/०९/२०१८ | २७,४५,६०८ |
| २ | ग्रोवर झंपा वाईनयार्डस् लि. मुंबई | १/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | ५३,७५,०११ |
| ३ | फ्रटेली वाईन्स प्रा.लि. सोलापूर | १/१०/२०१९ ते ३१/०३/२०२० | ७९,९६,१४७ |
| ४ | सुला वाईनयार्डस् प्रा.लि. नाशिक | १/१०/२०१९ ते ३१/०३/२०२० | ६,७७,३२,२११ |
| ५ | मोईत हेन्नेसी इंडिया प्रा.लि.मुंबई | १/०४/२०१९ ते ३०/०९/२०१९ | ७,७८,९०८ |
| ६ | मोईत हेन्नेसी इंडिया प्रा.लि.मुंबई | १/१०/२०१९ ते ३१/०३/२०२० | ३६,४७,७९५ |
| ७ | ग्रोवर झंपा वाईनयार्डस् लि. नाशिक | १/०४/२०१९ ते ३०/०९/२०१९ | २८,८२,३३५ |
| ८ | विनस सेलर्स प्रा.लि.नाशिक | १/१०/२०१९ ते ३१/०३/२०२० | २२,९६,१६२ |
| ९ | गुड ड्रॉप वाईन सेलर्स लि.नाशिक | १/०४/२०१९ ते ३०/०९/२०१९ | ५३,९८,९४६ |
| १० | गुड ड्रॉप वाईन सेलर्स लि. नाशिक | १/१०/२०१९ ते ३१/०३/२०२० | ७२,५१,४७८ |
| ११ | ओकवुड वाईनरी प्रा.लि.नाशिक | १/१०/२०१९ ते ३१/०३/२०२० | १२,७८,१२६ |
| १२ | फ्रटेली वाईन्स प्रा.लि. सोलापूर | १/०४/२०१५ ते ३१/०३/२०१६ | ८७,१२३ |
| १३ | एन.डी.वाईन्स प्रा.लि.नाशिक | १/१०/२०१९ ते ३१/०३/२०२० | ३०,४८,५०४ |
| १४ | सुला वाईनयार्डस् प्रा.लि. नाशिक | १/०४/२०१५ ते ३०/०९/२०१५ | ३८,७७,६०९ |

| | | | |
|---|---|---|---|
| १५ | सुला वाईनयार्डस् प्रा.लि. नाशिक | १/१०/२०१५ ते ३१/०३/२०१६ | ७१,३१,०४१ |
| १६ | सेवन पिक्स वाईनरी प्रा.लि.नाशिक | १/०४/२०१९ ते ३०/०९/२०१९ | ८०,५०६ |
| १७ | यॉर्क वाईनरी प्रा.लि. नाशिक | ०१/१०/२०१९ ते ३१/०३/२०२० | ३६,२६,५१२ |
| १८ | यॉर्क वाईनरी प्रा.लि. नाशिक | ०१/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | ३३,२५,८६० |
| १९ | यॉर्क वाईनरी प्रा.लि. नाशिक | १/०४/२०१९ ते ३०/०९/२०१९ | २५,४३,६१६ |
| २० | राजधीर वाईन्स प्रा.लि. नाशिक | १/०४/२०१९ ते ३०/०९/२०१९ | १८,३९,४९० |
| २१ | सेवन पिक्स वाईनरी प्रा.लि., नाशिक | १/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | ३२,०७,५१४ |
| २२ | गुड ड्रॉप वाईन सेलर्स लि. नाशिक | १/०४/२०१६ ते ३०/०९/२०१६ | ४८,२४६ |
| २३ | सुला वाईनयार्डस् प्रा.लि. नाशिक | १/०४/२०१६ ते ३०/०९/२०१६ | ८०,८९,७३१ |
| २४ | सुला वाईनयार्डस् प्रा.लि. नाशिक | १/१०/२०१६ ते ३१/०३/२०१७ | १,३३,९०,०६२ |
| २५ | फ्रटेली वाईन्स प्रा.लि. सोलापूर | १/०४/२०१७ ते ३१/०३/२०१८ | ६३,२०,५०१ |
| २६ | फ्रटेली वाईन्स प्रा.लि. सोलापूर | ०१/०४/२०१८ ते ३१/०३/२०१९ | ८२,४६,३०५ |
| २७ | फ्रटेली वाईन्स प्रा.लि. सोलापूर | ०१/०४/२०१९ ते ३१/०३/२०२० | ८०,९०,४१५ |
| २८ | ग्रोवर झंपा वाईनयार्डस् लि. नाशिक | १/०४/२०१८ ते ३०/०९/२०१८ | १,५२,६६,३१२ |
| २९ | सुला वाईनयार्डस् प्रा.लि. नाशिक | १/०४/२०१७ ते ३०/०९/२०१७ | १,२८,६५,७२५ |
| ३० | सुला वाईनयार्डस् प्रा.लि. नाशिक | १/१०/२०१७ ते ३१/०३/२०१८ | २,७१,७७,५८९ |
| ३१ | राजधीर वाईन्स प्रा.लि. नाशिक | १/१०/२०१७ ते ३१/०३/२०१८ | ३,२६,८९२ |
| ३२ | विनटेज वाईन, प्रा.लि. नाशिक | १/१०/२०१४ ते ३१/०३/२०१५ | ४१,०६,७१० |
| ३३ | सेवन पिक्स वाईनरी प्रा.लि.नाशिक | १/०४/२०१७ ते ३०/०९/२०१७ | २,२२,८८३ |
| ३४ | सेवन पिक्स वाईनरी प्रा.लि.नाशिक | १/१०/२०१७ ते ३१/०३/२०१७ | ५,०४,७४४ |
| | | **एकूण** | **२४,०८,०६,६१७** |

४. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्रमांक - के ७, लेखाशिर्ष २८५२ - उद्योग (००)(११) वाईन उद्योगास प्रोत्साहन (अनिवार्य) (२८५२ ०४७२), ३३ -अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

५. वरील परिच्छेदामध्ये नमूद केलेल्या एकूण रुपये २४,०८,०६,६१७/- (रुपये चोवीस कोटी आठ लक्ष सहा हजार सहाशे सतरा फक्त) एवढ्या रकमेच्या आहरणाचे आणि महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरणास वितरीत करण्याचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयातील लेखाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर धनादेश लेखाधिकारी, उद्योग संचालनालय यांचे नावे काढण्यात यावा व उद्योग संचालनालयाकडून सदर निधी महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरण, मुंबई यांना अदा करण्यात यावा.

७. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाने महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरणाकडून प्राप्त करुन शासनास त्वरीत सादर करावे.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ १२४/२०२२/व्यय-१६, दि.२८/०३/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संगणक संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३२९१३३११७६९१० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINOD SOPANRAO MENDHE

Digitally signed by VINOD SOPANRAO MENDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3dfd984bb7c5aede090473e34b1c93fa9f36d97d56c0cf07812a43c5ca5d6a24, pseudonym=323A3B33024CA3B9B9527D203D8EA5C5D8D48849, serialNumber=6CAF7EAF9A975C60BD4278CDB26344D74E2548D2175C80BA946EF0383ABE5111, cn=VINOD SOPANRAO MENDHE
Date: 2022.04.05 16:04:44 +05'30'

**( वि. सो. मेंढे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-४०० ०३२. (५ जादा प्रतीसह)
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग, (कार्यासन अर्थसंकल्प-१४/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई -४०० ०१०.
८. राज्यकर सह आयुक्त, विक्रीकर भवन, नाशिक विभाग, पाथर्डी फाटा, नाशिक-४२२०१०.
९. राज्यकर सह आयूक्त (व्हॅट व्यवस्थापन)सोलापूर विभाग,विक्रीकर भवन ,विजापूर रोड,सोलापूर.
१०.राज्यकर सह आयुक्त, मोठे करदाते कक्ष-३ वस्तू व सेवा करभवन,माझगांव,मुंबई.
११. महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरण, द्वारा-सिकॉम लि, अंधेरी (पूर्व), मुंबई -४०००९३.
१२.राज्यकर सह आयुक्त पुणे विभाग, पुणे.
१३. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई.
१४. संबंधित घटक नाशिक.
१५. अवर सचिव (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय -४०० ०३२.
१६. निवड नस्ती (उद्योग-२).